**विभागीय क्रीडा संकुल, नाशिक, औरंगाबाद व अमरावती या ठिकाणी जिल्हा क्रीडा संकुल उभारण्यास तत्वत: मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः जिक्रीसं-१२१८/प्र.क्र.११२/क्रीयुसे-१,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १६ ऑगस्ट, २०१८.

<u>वाचा :-</u>

१) शासन निर्णय, सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व विशेष सहाय्य विभाग, क्र.राक्रीधो २००३/प्र.क्र.११/क्रीयुसे-१, दिनांक २६ मार्च, २००३.
२) सहाय्यक संचालक, क्रीडा व युवक सेवा, पुणे यांचे पत्र क्र.जिक्रीसं/उभारणी/१३-१४/का-९/१७९९, दिनांक २३ मे, २०१८.

<u>**प्रस्तावना :-**</u>

राज्याचे क्रीडा धोरण २००१ अंतर्गत तालुका स्तरावर तालुका क्रीडा संकुलामध्ये विविध खेळाच्या किमान सुविधा उपलब्ध करुन देणे, जिल्हा स्तरावर जिल्हा क्रीडा संकुलांतर्गत राष्ट्रीय दर्जाच्या क्रीडा सुविधा उपलब्ध करुन देणे, त्याचप्रमाणे विभागीय स्तरावर विभागीय क्रीडा संकुलांतर्गत आंतरराष्ट्रीय दर्जाच्या क्रीडा सुविधा उभारण्याची योजना दिनांक २६ मार्च, २००३ च्या शासन निर्णयान्वये कार्यान्वित करण्यात आली आहे. ज्या ठिकाणी विभागीय क्रीडा संकुल आहेत, त्या जिल्हा मुख्यालयाच्या ठिकाणी जिल्हा क्रीडा संकुल उभारण्यात येवू नये असा धोरणात्मक निर्णय घेण्यात आला होता. मात्र विभागीय मुख्यालयाच्या ठिकाणी झालेली लोकसंख्येची वाढ व त्यामुळे जनतेसाठी खेळाच्या सुविधा उपलब्ध असल्याची गरज लक्षात घेता सदर योजनेंतर्गत विभागीय क्रीडा संकुल, नाशिक, औरंगाबाद व अमरावती या ठिकाणी जिल्हा क्रीडा संकुल उभारण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय:-

महाराष्ट्र राज्याचे क्रीडा धोरणांतर्गत विभागीय क्रीडा संकुल, नाशिक, औरंगाबाद व अमरावती या ठिकाणी संबंधित जिल्हयातील जिल्हा क्रीडा संकुल समितीच्या वतीने शिफारस करण्यात आलेल्या जागेवर जिल्हा क्रीडा संकुल उभारण्यास याद्वारे तत्वत: मान्यता देण्यात येत आहे.

२. नाशिक, औरंगाबाद व अमरावती येथील जिल्हा क्रीडा संकुलांच्या उभारणी संदर्भातील तपशिलवार प्रस्ताव राज्य क्रीडा विकास समितीच्या आगामी बैठकीत मान्यतेस्तव सादर करावा. सदर बाबीवर होणारा खर्च मागणी क्रमांक ई-३, प्रधान लेखाशीर्ष २२०४, क्रीडा व युवक सेवा, १०४, क्रीडा व खेळ, (१६) (०२) क्रीडा संकुलांची स्थापना, (२२०४ १८२७), ३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशीर्षाखाली उपलब्ध होणाऱ्या तरतूदीतून करण्यात यावा. जिल्हा क्रीडा संकुल उभारण्याच्या दृष्टीने आवश्यक ती पुढील कार्यवाही क्रीडा व युवक सेवा संचालनालयाने प्राथम्याने करावी.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०८१६१५१००५५१२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Rajendra Shankarrao Pawar

Digitally signed by Rajendra Shankarrao Pawar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education and Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=679184b88f7019ef64ad6ddc2495ca280267c0d4755ce63fa70c45cf755d9373, cn=Rajendra Shankarrao Pawar
Date: 2018.08.18 11:49:29 +05'30'

**( राजेंद्र पवार )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे स्वीय सहायक, मुंबई.
२. मा.मंत्री, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
३. मा.विरोधी पक्षनेता (विधानसभा / विधानपरिषद) यांचे स्वीय सहायक, मुंबई.

४. सर्व विधानसभा / विधानपरिषद सदस्य यांचे स्वीय सहायक.
५. प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
६. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे,
७. सर्व जिल्हाधिकारी (क्रीडा संचालनालयामार्फत)
८. महालेखापाल (लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ - मुंबई/महाराष्ट्र-२ नागपूर,
९. महालेखापाल (लेखा), महाराष्ट्र-१ - मुंबई/महाराष्ट्र-२ नागपूर
१०.सर्व उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा (क्रीडा संचालनालयामार्फत)
११.सर्व जिल्हा क्रीडा अधिकारी ( क्रीडा संचालनालयामार्फत)
१२.सर्व संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी ( क्रीडा संचालनालयामार्फत)
१३.वित्त विभाग (व्यय-५)/अर्थ-८/नियोजन विभाग (का.१४७१), मंत्रालय, मुंबई,
१४.कार्यासन अर्थसंकल्प, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई,
१५.निवड नस्ती (क्रीयुसे-१).